**अनुदान वाटप**
**जिल्हा परिषद व पंचायत समिती सार्वत्रिक निवडणुकांच्या कार्यालयीन खर्चासाठी अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जिपनी-२०१६/प्र.क्र.७०/पं.रा २**
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: २४ जानेवारी २०१७.

**संदर्भ:-**
१. या कार्यालयाकडील शासन निर्णय क्रमांक जिपनी-२०१५/ प्र.क्र.४९/ पं.रा.२, दिनांक २ नोव्हेंबर २०१५.
२. या कार्यालयाकडील शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २०१५/ प्र.क्र.२६५/ पं.रा.२, दिनांक १४ जून २०१६.
३. या कार्यालयाकडील शासन निर्णय समक्रमांक, दिनांक २६ ऑक्टोंबर २०१६.
४. राज्य निवडणुक आयोगाचे पत्र क्रमांक रानिआ/जिपपंस-२०१६/ प्र.क्र.५१/ कार्या-७, दिनांक ११ जानेवारी २०१७.

**प्रस्तावना :-**

दिनांक १४ जून २०१६ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांच्या कार्यालयीन खर्चासाठी रुपये ४०/- प्रति मतदार देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या आगामी सार्वत्रिक निवडणुकांसाठी प्रभागरचना बाबतचे नकाशे तयार करणे तसेच इतर अनुषंगिक कामासाठी तसेच त्या अनुषंगाने होणा-या कार्यालयीन खर्चासाठी प्रत्येकी रुपये १५,००,०००/- (अक्षरी रुपये पंधरा लक्ष ) याप्रमाणे रुपये ३,९०,००,०००/- (नागपूरसह) उपलब्ध करुन देण्यात आलेले आहेत.

राज्यातील २५ जिल्हा परिषदा व त्याअंतर्गत येणा-या २९८३ पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांचा कार्यक्रम राज्य निवडणुक आयोगाने दिनांक ११ जानेवारी २०१७ रोजी जाहीर केलेला आहे.

३. राज्य निवडणुक आयोगाने जाहीर केलेल्या कार्यक्रमानुसार जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांसाठी येणा-या कार्यालयीन खर्चामध्ये जसे की, निवडणुकांसाठी

स्टेशनरी (मतपत्रिका व नमुने छपाई यासह), सर्व प्रकारचे निवडणुक साहित्य, ई.व्ही.एम मशिन देखभाल व दुरुस्ती खर्च, जाहिरात खर्च, सर्व प्रकारची वाहतुक व इंधन खर्च, निवडणुक कामासाठी अधिग्रहीत केलेल्या वाहनांचे भाडे, ई.व्ही.एम मशिन चे ने-आण करण्यासाठी होणारा खर्च निवडणुक प्रशिक्षणासाठी/मतदानासाठी/मतमोजणीसाठी भाडयाने घेतलेले हॉल आणि मंडप/खाजगी आस्थापना यांचे भाडे, सदर प्रयोजनासाठी भाडयाने घेतलेले फर्निचर साहित्य यांचे भाडे, संगणक व्यवस्था, दुरध्वनी संबंधित अनुषंगिक खर्च, विज व जनरेटर व्यवस्थेवरील खर्च, मतदार जागृती अभियानावरील खर्च, छायाचित्रण व व्हिडीओग्राफी यावरील खर्च, मतदार केंद्रावर आवश्यक सोयी सुविधांसाठी आवश्यक असलेला अनुषंगिक खर्च तसेच प्रत्यक्ष निवडणुक कामासाठी नियुक्त केलेल्या अधिकारी/कर्मचारी आणि पोलीस कर्मचारी यांचे मानधन त्याचबरोबर निवडणुकांच्या अनुषंगाने आवश्यक असणा-या इतर बाबींवरील खर्चाचा समावेश आहे.

**शासन निर्णय :-**

४. लेखाशिर्ष - मागणी क्र.एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, (०२) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकांबाबतचा खर्च, (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणूकाबाबतचा खर्च, (२०५३ ०५२९) दत्तमत (योजनेतर) (राज्यक्षेत्र)" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ साठी मंजुर करण्यात आलेल्या आर्थिक तरतुदी मधुन, जिल्हा परिषद व पंचायत समित्यांच्या सार्वत्रिक निवडणुकांच्या कार्यालयीन खर्चासाठी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार निधी संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून सुपूर्द करण्यात येत आहे.

(अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन आहे.

(ब) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे जिल्हा परिषद व पंचायत समिती सार्वत्रिक निवडणुकांसाठी कार्यालयीन खर्चासाठी वापरण्यात यावे. याकामी कोणतीही अनियमितता होणार नाही व अनावश्यक खर्च होणार नाही याची काळजी विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. राज्य निवडणुक आयोगाकडुन अंतिम जिल्हा निहाय मतदार संख्या प्राप्त झाल्यानंतर रुपये ४०/- प्रति मतदार याप्रमाणे उर्वरीत अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल

(क) मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही आणि कोणतीही अनियमितता घडणार नाही, याची दक्षता विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी घ्यावी व शिल्लक रक्कम दि.३१.३.२०१७ पुर्वी समर्पित करावी.

(ड) या अनुदानातून होणाऱ्या खर्चाची विवरणपत्रे विभागीय आयुक्त यांनी राज्य निवडणूक आयोग व शासनाकडे पुढील १५ तारखेपूर्वी सादर करावीत, खर्चावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

(इ) सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार (B.D.S) जिल्हाधिकारी यांचा (युजर आयडी क्रमांक ००९३०), उप जिल्हा निवडणूक अधिकारी (युजर आयडी क्रमांक ०००९३४), जिल्हाधिकारी यांचे प्रमुख लिपिक (युजर आयडी क्रमांक ०००९४८) यांच्या युजर आयडीवर वितरीत करण्यात येत आहे.

(ई) उपरोक्त प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र.एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, (०२) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणुकांबाबतचा खर्च, (०२) (०१) जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्या निवडणूकाबाबतचा खर्च, (२०५३ ०५२९) दत्तमत (योजनेतर) (राज्यक्षेत्र)" या लेखाशीर्षाखालील सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२४११३५४४१६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R Bankar

Digitally signed by Sanjay R Bankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay R Bankar
Date: 2017.01.24 17:03:19 +05'30'

**(संजय बनकर)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:-

१) मा. सचिव, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
२) मा.विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, औरंगाबाद, पुणे, अमरावती, नागपुर.
३) मा.जिल्हाधिकारी, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, नाशिक, जळगाव, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद, लातुर, अमरावती, बुलडाणा, यवतमाळ, वर्धा, चंद्रपुर, गडचिरोली.
४) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई, नागपूर
५) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व परिक्षण) मुंबई, नागपूर
६) जिल्हा लेखा कोषागार अधिकारी, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, नाशिक, जळगाव, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद, जालना, परभणी,

हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद, लातुर, अमरावती, बुलडाणा, यवतमाळ, वर्धा, चंद्रपुर, गडचिरोली.

७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई (दोन प्रती)

८) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-७ व वित्त-८.

९) वित्त विभाग/ (अर्थसंकल्प-३, १६ व व्यय-१५), मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती.

**शासन निर्णय क्रमांक : जिपनी-२०१६/प्र.क्र.७०/पं.रा.२ दिनांक २४ जानेवारी २०१७ चे विवरणपत्र**

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | दिनांक च्या २६.१०.२०१६ शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेले अनुदान | दिनांक २४.०१.२०१७ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात येत असलेले अनुदान | एकुण |
|---|---|---|---|---|---|
| १ | **कोकण** | रायगड | १५,००,०००/- | ४,४०,०१,१५०/- | ४,५५,०१,१५०/- |
| २ | | रत्नागिरी | १५,००,०००/- | ३,६६,१९,९५०/- | ३,८१,१९,९५०/- |
| ३ | | सिंधुदुर्ग | १५,००,०००/- | १,७०,२०,३२०/- | १,८५,२०,३२० /- |
| ४ | **नाशिक** | नाशिक | १५,००,०००/- | ७,२८,१२,९४०/- | ७,४३,१२,९४० /- |
| ५ | | जळगाव | १५,००,०००/- | ६,६१,३३,४७०/- | ६,७६,३३,४७० /- |
| ६ | | अहमदनगर | १५,००,०००/- | ७,७५,१२,८९०/- | ७,९०,१२,८९०/- |
| ७ | **पुणे** | पुणे | १५,००,०००/- | ८,४७,७१,७८०/- | ८,६२,७१,७८०/- |
| ८ | | सातारा | १५,००,०००/- | ५,९३,२९,२९०/- | ६,०८,२९,२९० /- |
| ९ | | सांगली | १५,००,०००/- | ४,८१,७०,७३०/- | ४,९६,७०,७३० /- |
| १० | | सोलापूर | १५,००,०००/- | ६,४८,२३,७९०/- | ६,६३,२३,७९० /- |
| ११ | | कोल्हापूर | १५,००,०००/- | ६,४६,१०,१३०/- | ६,६१,१०,१३०/- |
| १२ | **औरंगाबाद** | औरंगाबाद | १५,००,०००/- | ४,६३,०५,६००/- | ४,७८,०५,६०० /- |
| १३ | | जालना | १५,००,०००/- | ३,३४,३०,१७०/- | ३,४९,३०,१७०/- |
| १४ | | परभणी | १५,००,०००/- | २,७१,२६,०३०/- | २,८६,२६,०३० /- |
| १५ | | हिंगोली | १५,००,०००/- | २,११,४१,४५०/- | २,२६,४१,४५० /- |
| १६ | | बीड | १५,००,०००/- | ४,५०,४६,५३०/- | ४,६५,४६,५३०/- |
| १७ | **अमरावती** | नांदेड | १५,००,०००/- | ५,१८,२६,२३०/- | ५,३३,२६,२३०/- |
| १८ | | उस्मानाबाद | १५,००,०००/- | ३,१३,६५,२४०/- | ३,२८,६५,२४०/- |
| १९ | | लातुर | १५,००,०००/- | ३,९१,३५,७२०/- | ४,०६,३५,७२०/- |
| २० | | अमरावती | १५,००,०००/- | ४,१७,३८,८५०/- | ४,३२,३८,८५०/- |
| २१ | | बुलडाणा | १५,००,०००/- | ४,५९,८४,२७०/- | ४,७४,८४,२७० /- |
| २२ | | यवतमाळ | १५,००,०००/- | ४,६९,८२,३१०/- | ४,८४,८२,३१० /- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २३ | **नागपूर** | वर्धा | १५,००,०००/- | २,३३,४१,७१०/- | २,४८,४१,७१० /- |
| २४ | | चंद्रपुर | १५,००,०००/- | ३,५७,९८,९४०/- | ३,७२,९८,९४० /- |
| २५ | | गडचिरोली | १५,००,०००/- | १,८०,५७,८१०/- | १,९५,५७,८१०/- |
| | | **एकुण** | **३,७५,००,०००/-** | **१,१४,३०,८७,३००/-** | **१,१८,०५,८७,३००/-** |

**(अक्षरी रक्कम रुपये एकशे चौदा कोटी तीस लक्ष सत्त्याऐशी हजार तीनशे मात्र)**

Sanjay R Bankar

Digitally signed by Sanjay R Bankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay R Bankar
Date: 2017.01.24 17:03:19 +05'30'

**(संजय बनकर)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन